**औषध नियंत्रण प्रयोगशाळा, औरंगाबाद येथील औषध नमुन्यांचे उपकरणांची सन २०१८-१९ या वर्षात वार्षिक सेवा सुविधा करार करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१८/प्र.क्र.९२/औषधे-२**

गो. ते.रुग्णालय, आवार इमारत, ९ वा मजला,

लो. टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१

दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा</u> :-

१) सहाय्यक संचालक, अन्न व औषध प्रशासन प्रयोगशाळा, औरंगाबाद यांचे पत्र क्र.भांडार/१०६१/२०१८/०५, दिनांक १२.०६.२०१८.

२) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई यांचे पत्र क्र.भांडार/अवऔप्रऔ/अ.सं.व सं.उ./२०१८/३ब, दिनांक ३१.०७.२०१८.

<u>प्रस्तावना</u> :-

आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारितील औषध नियंत्रण प्रयोगशाळा, औरंगाबाद येथील औषध नमुन्याच्या चाचणीच्या कामी संवेदनशील व अतिसंवेदनशील उपकरणे सुस्थितीत ठेवण्यासाठी व त्याच्या देखभालीसाठी उपकरणाचे मुळ उत्पादक, पुरवठादार, अधिकृत विक्रेते यांचेकडून दरपत्रके मागवुन सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये वार्षिक सेवा सुविधा करार करण्याबाबत व तद्नुषंगाने येणाऱ्या खर्चास मान्यता मिळणेबाबत उपरोक्त संदर्भाधिन क्र.०२ येथे नमूद दिनांक ३१.०७.२०१८ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई यांच्या अखत्यारितील औषध नियंत्रण प्रयोगशाळा, औरंगाबाद येथील औषध नमुन्याच्या चाचणीच्या कामी संवेदनशील व अतिसंवेदनशील उपकरणे सुस्थितीत ठेवण्यासाठी व त्याच्या देखभालीसाठी उपकरणाचे मुळ उत्पादक, पुरवठादार, अधिकृत विक्रेते यांचेकडून दरपत्रके मागवुन सन २०१८-१९ मध्ये वार्षिक सेवा सुविधा करार करण्यासाठी रु.६,७८,९०१/- (अक्षरी रुपये सहा लाख अठ्याहत्तर हजार नऊशे फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो "योजनाबाहय, मागणी क्र.एस-१, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, २२१०- वैदयकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, (१०४) (०१) औषध नियंत्रण (०१) (०५) अन्न व औषध प्रशासनाची पुर्नरचना व अन्न व औषध चाचणी विश्लेषण प्रयोगशाळेची आस्थापना (२२१० ५०८६) (२७) परिरक्षण" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वित्त विभाग आणि उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अटी व मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक इएसटी ३०९३/ १२३२/ सीआर १००/ दक्षता/ भाग-४, दिनांक २६.३.१९९९ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग- दुसरा तसेच महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील अनुक्रमांक ४ व नियम क्र. ७ नुसार खर्चाच्या रकमेस मंजूरी देण्याचे प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२४१५३५२०३११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHAJAN HEMANT ANANT

Digitally signed by MAHAJAN HEMANT ANANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drug Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, serialNumber=4146b85aaa58555e80c9d75a2aba23b993e46df208b0b469f1b74670dc22d7fa, cn=MAHAJAN HEMANT ANANT
Date: 2018.09.27 12:03:53 +05'30'

**(हेमंत महाजन)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई (२ प्रति).
२. महालेखापाल-महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. संबंधित निवासी कोषागार अधिकारी.

५. सहायक संचालक, औषध नियंत्रण प्रयोगशाळा, औरंगाबाद.
६. वित्त विभाग (विनियम/व्यय-१३).
७. निवड नस्ती, औषधे-२.